दिनांक ३१ मार्च २००२ रोजी किंवा
त्यापूर्वी संपणाऱ्या निर्धारणा
कालावधीसाठी व्यवसायकर
अधिनियमाखाली मालकांच्या निर्धारणा

महाराष्ट्र शासन

वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांक व्यकर-११०४ /प्र.क्र.५३ /कराधान- ३ ,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: २४।८।२००४

## शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य व्यवसाय, व्यापार, आजीविका व नोकऱ्या यावरील कर अधिनियम, १९७५ या अधिनियमाखाली व्यावसायिक व नोकरदार यांचेकडून १९७५ सालापासून व्यवसायकर वसूल करण्यात येतो. नोकरदारांच्या बाबतीत त्या त्या संस्थांच्या किंवा आस्थापनांच्या मालकांनी हा कर शासनाला भरायचा असतो. कर योग्य प्रमाणात व विहीत वेळेत भरला आहे काय हे पाहण्यासाठी अधिनियमातील तरतुदींप्रमाणे मालकांची निर्धारणा केली जाते. निर्धारणेच्या वेळी हिशेबाची पुस्तके, पगार विषयक नोंदवहया , पैसे भरल्याबद्दल पुरावा इत्यादी गोष्टी पहाणे आवश्यक असतात.

वेगवेगळया कारणांमुळे व्यवसायकर अधिनियमाखालील मालकांच्या निर्धारणेचे काम मोठया प्रमाणात प्रलंबित राहिले आहे. त्यामुळे सर्व उपलब्ध कर्मचारी वर्ग निर्धारणेच्या कामातच गुंतलेला राहतो व अधिक महत्वाची अशी इतर कामे उदा. कसूरदारांचा पाठपुरावा, वसुली इत्यादी मागे राहतात व त्याचा महसुलावर अनिष्ट परिणाम होतो. माननीय वित्तमंत्र्यांनी त्यांच्या २००४-०५ च्या अर्थसंकल्पविषयक भाषणात या मुद्याचा उल्लेख करुन म्हटले होते की, ३१ मार्च २००२ च्या पूर्वीच्या कालावधीसाठी निर्धारणा करायच्या नाहीत असे त्यांनी ठरविले आहे. याला अनुसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय करीत आहे :-

## शासन निर्णय:

१ जुलै,२००४ नंतर व्यवसायकर अधिनियमाखाली रोजी नोंदीत असलेल्या मालकांची निर्धारणेसाठी जी प्रकरणे शिल्लक असतील त्यापैकी ३१ मार्च २००२ रोजी किंवा त्यापूर्वी संपणाऱ्या कालावधीच्या निर्धारणेसाठी.

अ)

१) निर्धारणेसाठी नोटीस काढली नसेल तर काढू नये.

२) निर्धारणेसाठी नोटीस काढली असेल परंतू अद्याप हिशोबाच्या पुस्तकांची पडताळणी चालू झाली नसेल तर हजर राहण्यासाठी स्मरणपत्र काढू नये.

३) पडताळणी चालू झाली असेल परंतू सुनावणी झाली नसेल तर सुनावणीसाठी बोलावू नये.

४) पडताळणी व सुनावणी १ जुलै २००४ पूर्वी संपली असेल तर निर्धारणा आदेश पारित करावेत.

ब) मात्र,

१) एखाद्या प्रकरणात निर्धारणेनंतर परतावा मिळणार आहे म्हणून निर्धारणा घेण्यात यावी असा अर्ज जर एखाद्या मालकाने केला तर,

२) ३१ मार्च २००२ रोजी किंवा त्यापूर्वी संपणाऱ्या कालावधीसाठी अन्वेषण चालू झाले असेल किंवा या शासन निर्णयाच्या तारखेनंतर होणाऱ्या अन्वेषणात करचुकवेगिरी आढळली तर,

३) ३१ मार्च २००२ रोजी किंवा त्यापूर्वी संपणाऱ्या कालावधीसाठी व्यवसायकर अधिनियमाखाली कर दायित्वाचा भरणा न केल्याचे आढळल्यास,

४) अपिल अधिकारी, न्यायाधिकरण अथवा कोर्ट यांच्या आदेशास परिणामकारक रुप देण्यास आवश्यक असेल तर,

त्या प्रकरणात सलगपणे वरिष्ठ असलेल्या अधिकाऱ्यांची पूर्वपरवानगी घेऊन निर्धारणा करता येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सु.ना. जामदे )
शासनाचे उपसचिव.

प्रति,

१) विक्रीकर आयुक्त महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई -४०० ०१० (४० प्रती)

प्रत:

माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी अग्रेषित.

१) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मुंबई
७) निवडनस्ती, कराधान-३.